अर्थ व सांख्यिकी
संचालनालयाच्या प्रादेशिक
कार्यालय, कोकण भवन येथील
प्रशिक्षण सभागृहाच्या
नूतनीकरणास मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१३/का.१४२६
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २७ जून, २०२३

**शासन निर्णय**:- संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांनी त्यांच्या दि.१२/०४/२०२३ रोजीच्या पत्रान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या प्रादेशिक कार्यालय, कोकण विभाग येथील प्रशिक्षण सभागृहाच्या नूतनीकरण, दुरुस्ती व इतर अनुषंगिक कामे करणे या कामाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास सादर केले होते.

२. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती अंदाजपत्रकातील कामाच्या वावातील समाविष्ट बाबी व त्याच्या किंमतीमध्ये सुधारणा केल्यावर येणारे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे.

| | | |
|---|---|---|
| (१) Repair & Renovation to Civil Work | | |
| Sr. No. | Name of Work | Cost in Rs. |
| १ | Work Portion Amount | २,४९५,४२०.०० |
| | Total(A) | २,४९५,४२०.०० |
| २ | Material Testing Charges | ९,८८०.०० |
| | Total (B) | २,५०५,३००.०० |
| ३ | Reimbursement For Royality Charges | २८२.४७ |
| ४ | ०.५ % Insurance Charges on Total (A) | १२४७७.१० |
| ५ | १८ % G.S.T. Charges on Total (A) | ४४९,१७५.६० |
| ६ | Add ५ % Centage charges on C | १२५,२७९.१२ |
| ७ | Add ४%Contengecies | १००२२३.३० |
| | Total | ३,१९२,७३७.५९ |
| | Say | ३,१९२,७३८.०० |
| (२) Repairs & Renovation to Electrical Work | | |
| १ | Repairs & Renovation to Electrical Work | |
| | a. Electrical Work | ६२६७४८.०० |
| | b. Telephone & LAN Wiring | २९२३६२.०० |
| | c. AC System | ५३५२१८.०० |
| | d. PA System | २८०३८२.०० |
| | e. Fire Detection System | ५४३७५.०० |
| | Total Cost in Rs. | १७८९०८५.०० |
| २ | ४ % contengency | ७१५६३.४० |
| ३ | GST १८% | ३३४९१६.७१ |
| ४ | Grand Total in Rs. | २१९५५६५.११ |
| | Say | २१९५५६५.०० |
| Repair & Renovation to Civil Work | | ३,१९२,७३८.०० |
| Repairs & Renovation to Electrical Work | | २१९५५६५.०० |
| Total | | **५३,८८,३०३.००** |

३. वरील विवरणपत्रामध्ये नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या ₹५३,८८,३०३/- लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास शासन या आदेशाद्वारे खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देत आहे.

(१) नियोजित जागा विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिद्ध करण्यात याव्यात.

(२) आवश्यक त्या प्रमाणपत्रांना नगरपालिका, तत्सम प्राधिकरणे, इ. यांची "मंजुरी" आणि "ना हरकत" प्रमाणपत्रे बांधकाम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करण्यात यावी.

(३) अंदाजपत्रकातील तरतूदी ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या असल्याने सदर तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुन त्यास सक्षम स्तरावरून तांत्रिक मान्यता घेऊनच काम हाती घ्यावे.

(४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र. बीजीडी२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

(५) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा वापर करावा अथवा उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये वस्तू व सेवा खरेदीकरीता केंद्र शासनाने विकसित केलेल्या GeM पोर्टल कार्यपद्धतीचा अवलंब करणे शक्य आहे किंवा कसे या बाबींचा स्वतंत्ररित्या विचार करावा.

(६) स्थापत्य कामांच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

(७) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही या दृष्टीने दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. ही मान्यता वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे,२००९ नुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

५. सदर कामासाठी येणारा खर्च "-मागणी क्रमांक ओ-९, ३४५४ गणना, सर्वेक्षण व सांख्यिकी, ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी, ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी (०३)(०१) नियोजनाकरिता आकडेवारी (३४५४ ०५१८)" अंतर्गत १३- कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनासच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२७१८१५१६१७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRIYANKA HITESH CHAUDHARI

Digitally signed by PRIYANKA HITESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=eeffb9744cce39c369c958eced6163d347a98307912eb27a2b07fec86b6aa34a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46EDCE88B1B3E4F928D7C163E3E2F597BB1223A463D75A6A70F182EFFFC6A255, cn=PRIYANKA HITESH CHAUDHARI
Date: 2023.06.28 11:56:03 +05'30'

**(प्रियंका चौधरी)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेय), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखापरीक्षा), नागपूर

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे (पू.)
५. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, ३ रा मजला,  बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ , फोर्ट, मुंबई- ४००००१
६. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल-४१० २०६
७. संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, ८ वा मजला, प्रशासकीय इमारत, शासकीय वसाहत, बांद्रा ( पूर्व), मुंबई-४०००५१
८. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,प्रादेशिक कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई.
९. निवड नस्ती-का.१४२६